**राज्य नदी संवर्धन योजनेतंर्गत नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांच्या गोदावरी नदी संवर्धन प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरण करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रानयो २०२२/प्र.क्र. ८३/आस्थापना - अ**
नवीन प्रशासकीय इमारत, १५ वा मजला
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक - ३१/०३/२०२२

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः- रानयो २०१९/प्र.क्र. ६१/तां.क.३, दिनांक ११/०९/२०१९**
२) **मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद यांचे क्र. प्रपत्र नमुना क्र. ८५ बाब क्र. ५८ माहे सप्टेंबर २०१९, दिनांक १६/०९/२०१९ रोजीचे पत्र.**
३) **शासन निर्णय क्रमांकः- रानयो २०१९/प्र.क्र. ६१/तां.क.३, दिनांक १०/०१/२०२०**
४) **वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं - २०२१/प्र.क्र.४८/अर्थ - ३, दिनांक १४ ऑक्टोबर २०२१ व दिनांक ३ फेब्रुवारी २०२२.**
५) **सचिव प्रदत्त समितीच्या दि.१७.०३.२०२२ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.**

प्रस्तावना -

उपरोक्त संदर्भिय क्र. १ च्या शासन निर्णयान्वये राज्य नदी संवर्धन योजनेतंर्गत आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांच्याकडून प्राप्त गोदावरी नदीचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्याच्या एकूण रु. १७,५९,८१,०५९/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या तांत्रिक मान्यतेच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यामध्ये राज्य शासनाचा हिस्सा (८०%) रु. १३,९३,०७,११३/- (रु. तेरा कोटी त्र्याण्णव लक्ष सात हजार एकशे तेरा फक्त) एवढा होता. दरम्यान, आयुक्त नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांनी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे सादर केलेल्या गोदावरी नदी संवर्धनाच्या रु. १७,२५,९२,८८३/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने त्यांच्या संदर्भाधिन पत्र क्र. २ अन्वये तांत्रिक मंजूरी दिली आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने तांत्रिक मंजूरी दिलेल्या रु. १७,२५,९२,८८३/- व दिनांक ११/०९/२०१९ रोजीच्या प्रशासकीय मान्यतेमध्ये नमूद केल्यानूसार १% कंटीजन्सी चार्जेस रु. १५,४१,००८/- अशा एकूण रु. १७,४१,३३,८९१/- इतक्या प्रकल्प किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरीत करण्याबाबत उपरोक्त संदर्भिय क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. सदर निधी वितरीत करण्याबाबतचे देयक अधिदान व लेखा कार्यालस सादर करण्यात आले होते. तथापि, सदर देयकावर अधिदान व लेखा कार्यालयाने आक्षेप नोंदविले होते. आता, याबाबत सुधारित प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

राज्य नदी सवंर्धन योजनेतंर्गत आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांच्याकडून प्राप्त गोदावरी नदीचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन प्रस्तावास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने दिलेल्या तांत्रिक मान्यतेनुसार सोबत जोडलेल्या “प्रपत्र - अ” मध्ये नमूद केलेली कामे पूर्ण करण्यासाठी एकूण रुपये रु. १७,४१,३३,८९१/- (रूपये सतरा कोटी एक्केचाळीस लक्ष तेहत्तीस हजार आठशे एक्याण्णव फक्त) इतक्या रकमेस खालील अटी व सोबत जोडलेल्या “प्रपत्र - ब” मधील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर मंजूर एकूण रकमेपैकी ८०% हिस्सा राज्य शासन व २०% हिस्सा नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांचा राहील.

| अ.क्र. | हिस्सा | मंजूर निधी (रूपये) | अक्षरी मंजूर निधी |
|---|---|---|---|
| १) | ८०% राज्य शासन | १३,९३,०७,११३/- | रूपये तेरा कोटी त्र्याण्णव लक्ष सात हजार एकशे तेरा फक्त |
| २) | २०% नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड | ३,४८,२६,७७८/- | रूपये तीन कोटी अठ्ठेचाळीस लक्ष सव्वीस हजार सातशे अठ्ठ्यात्तर फक्त |
| एकूण | | १७,४१,३३,८९१/- | (रूपये सतरा कोटी एक्केचाळीस लक्ष तेहत्तीस हजार आठशे एक्याण्णव फक्त) |

२. राज्य शासनाच्या वरील ८०% हिश्यापोटीची रक्कम रू. १३,९३,०७,११३/- (रूपये तेरा कोटी त्र्याण्णव लक्ष सात हजार एकशे तेरा फक्त) राज्य शासनाच्या दिनांक ११/०९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानूसार दोन टप्प्यामध्ये महानगरपालिकेस वितरीत करण्यात येणार असून त्यापैकी रू. ६,९६,५३,५५६/- (रूपये सहा कोटी शहाण्णव लक्ष त्रेपन्न हजार पाचशे छपन्न फक्त) इतक्या रकमेचा पहिला हप्ता सदर शासन निर्णयान्वये आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यु - ४, ३४३५ परिस्थितीकी व पर्यावरण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (०१) पर्यावरण संरक्षण, (०१) (०१) राज्य नदी संवर्धन योजना (कार्यक्रम) (३४३५ १३२९), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य लेखाशिर्षाखाली सन २०२१- २२ या आर्थिक वर्षाकरिता सुधारित अंदाजानूसार उपलब्ध करण्यात आलेल्या रु. २० कोटी इतक्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा. सदर लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

४. आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका यांना अदा करावयाची रू. ६,९६,५३,५५६/- (रूपये सहा कोटी शहाण्णव लक्ष त्रेपन्न हजार पाचशे छपन्न फक्त) एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी

यांच्यामार्फत कोषागारातून वित्त विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२०/ प्र.क्र.६/ २०/कोषा-प्रशा ५,दि १२.११.२०२१ अन्वये ई-कुबेर प्रणालीद्वारे थेट आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका यांच्या बँक खात्यात जमा करावे.

५. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं - २०२१/प्र.क्र. ४८/अर्थ - ३, दिनांक १४ ऑक्टोबर २०२१ व दिनांक ३ फेब्रुवारी २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानूसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येत की, दिनांक २४.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्टातील अनु.क्र. २ व ९ मधील अटींची पूर्तता होत आहे, तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक अर्थसं - २०२१/प्र.क्र. ४८/अर्थ - ३, दिनांक २४ जून, २०२१ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार वितरीत करण्यात येत आहे.

i) वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं - २०२१/प्र.क्र.४८/अर्थ - ३, दिनांक २४ जून २०२१ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील ३१ वेतनेतर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यात विभागाला अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

ii) वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं - २०२१/प्र.क्र.४८/अर्थ - ३, दिनांक २४ जून २०२१ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १,३,५,६,७ व ८ या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर परिशिष्टातील अनुक्रमांक ४ बाबत नमूद करण्यात येते की, ही योजना केंद्र पुरस्कृत, बाह्य सहाय्यित योजना नाही.

Iii) वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं - २०२१/प्र.क्र.४८/अर्थ - ३, दिनांक २४ जून २०२१ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, सदर योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये कसलाही बदल करण्यात आलेला नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र. ९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक १,२,३ व ४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक ५ ते १० या प्रकरणी लागू नाही.

६. या शिवाय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा. प्रशा ५ दिनांक १०.०५.२०१६ अन्वये परिच्छेद क्र. ४ मधील खालील बाबींची पूर्तता होत आहे.

i) विभागास प्रदान वित्तीय अधिकाराबाबत वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ - ३, दिनांक ०२.०४.२०१८ मधील परिच्छेद क्र. ६ (अ) नूसार रु. ५ कोटी पर्यंतच्या अनावर्ती योजनेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना आहेत.

Ii) गोदावरी नदीच्या संवर्धनासाठी रु. १७,४१,३३,८९१/- (राज्य शासनाचा हिस्सा रु. १३,९३,०७,११३/-) एवढ्या मंजूर निधीमधील रु. ६,९६,५३,५५६/- (रु. सहा कोटी शहाण्णव लक्ष त्रेपन्न हजार पाचशे छपन्न फक्त) इतका निधी प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत आहे.

iii) मागणी क्र. यु - ४, ३४३५ परिस्थितीकी व पर्यावरण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (०१) पर्यावरण संरक्षण, (०१) (०१) राज्य नदी संवर्धन योजना (कार्यक्रम) (३४३५ १३२९), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

iv) नांदेड - वाघाळा महानगरपालिकेकडून पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास कोणतेही येणे बाकी नाही. तसेच मागील तीन महिन्यात कोणताही निधी मुक्त करण्यात आलेला नाही.

v) तसेच उपरोक्त शासन निर्णयाच्या “अ” मधील परिच्छेदातील ६,७,८,९ बाबी लागू नाहीत.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संमतीने, वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.१५०/२०२२/व्यय १६, दि.३१.०३.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११७३८३१४९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: CN = SURYAKANT KISAN NIKAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT
Date: 2022.03.31 17:40:43 +05'30'

**( सु.कि. निकम )**
**सह सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल)**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
४. सर्व विभागीय आयुक्त.
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ.
६. आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. मा. सर्व मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०. शासनाचे मा. मुख्य सचिव/ सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव यांचे खाजगी सचिव
११. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६ / अर्थसंकल्प - ७), मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग, कार्यासन क्र. १४७२, मंत्रालय, मुंबई.
१३. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती.

**शासन निर्णय क्रमांक - रानयो २०२२/ प्र.क्र. ८३/आस्थापना - अ, दिनांक ३१/०३/२०२२ सोबतचे "प्रपत्र - अ"**

| गोदावरी नदी संवर्धन योजना | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अ. क्र.** | **कामाचा प्रकार** | **प्रस्तावित किंमत (रूपयांमध्ये)** | **समितीचा निर्णय** | **समितीने मान्य केलेली रक्कम (रूपयांमध्ये)** | **महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने तांत्रिक मंजूरी दिलेली रक्कम** |
| १ | रिस्टोरेशन ऑफ फक्शनिंग कॅपॅबिलिटीज ऑफ एक्झिस्टींग इंटरसेप्टींग अँड डायव्हर्जन वर्कस् | २१,०७,९६०/- | मंजूर करण्यास हरकत नसावी. | २१,०७,९६०/- | २४,३२,२६८/- |
| २ | इरेक्शन ऑफ अॅडीशनल स्क्रिन अँड डेव्हलपिंग स्लिट ट्रॅप्स | १४,९२,२००/- | मंजूर करण्यास हरकत नसावी. | १४,९२,२००/- | १४,९२,२००/- |
| ३ | डिझायनिंग अँड कंस्ट्रक्शन ऑफ एस.टी.पी. व इतर | १३,९३,४३,६००/- | मंजूर करण्यास हरकत नसावी. | १३,९३,४३,६००/- | १३,४७,१२,५५७/- |
| ४ | डेव्हलपिंग स्टोरेज फॅसिलिटी फॉर स्टोरींग अँड डिस्ट्रीब्यूटींग ट्रीटेड रिसायकलड वॉटर | १,२७,९१,६९१/- | मंजूर करण्यास हरकत नसावी. | १,२७,९१,६९१/- | १,५४,६३,७६३/- |
| ५ | प्रोक्यूरींग सक्शन अँड जेटींग मशिन्स अँड ऑदर मॉडर्न टुल्स | १,०२,००,०००/- | महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून तांत्रिक मान्यता मिळणार नसल्यामुळे वगळण्यात यावे. | ०० | ०० |
| ६ | प्रोक्युरींग एरीएशन अँड ऑदर इक्विपमेंट | ६,००,०००/- | वगळण्यात यावे. | ०० | ०० |
| एकूण | | १६,६५,३५,४५१/- | | १५,५७,३५,४५१/- | १५,४१,३५,४५१/- |
| १२ % जीएसटी | | १,९९,८४,२५४/- | | १,८६,८८,२५४.१२/- | १,८४,९२,०९५/- |
| १% थर्ड पार्टी इन्सपेक्शन | | १६,६५,३५५/- | सदर खर्च महानगरपालिकेने करावा. | ०० | ०० |
| १ % टेक्निकल चार्जेस | | १६,६५,३५५/- | सदर खर्च महानगरपालिकेने करावा. | ०० | ०० |
| ३% कंटिजन्सी चार्जेस | | ४९,९६,०६४/- | ३% ऐवजी १% देण्यात यावे | १५,५७,३५४/- | १५,४१,००८/- |
| ३% (१% प्रिपरेशन चार्जेस व २% सुपरव्हीजन चार्जेस) | | ४९,९६,०६४/- | सदर खर्च महानगरपालिकेने करावा | ०० | ०० |
| **अंतिम एकूण** | | **१९,९८,४२,५४३/-** | | **१७,५९,८१,०५९/-** | **१७,४१,३३,८९१/-** |

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: CN = SURYAKANT KISAN NIKAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT
Date: 2022.03.31 17:40:54 +05'30'

**( सु.कि. निकम )**

**सह सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल)**

## शासन निर्णय क्रमांक - रानयो २०२२/ प्र.क्र. ८३/आस्थापना - अ, दिनांक ३१/०३/२०२२ सोबतचे

## "प्रपत्र - ब"

## राज्य नदी संवर्धन योजनेतंर्गत नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड येथील गोदावरी नदीच्या संवर्धन कामांसाठीच्या अटी व शर्ती.

१. आयुक्त नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांनी राज्य नदी संवर्धन योजनेतंर्गत सादर केलेल्या गोदावरी नदी संवर्धनाच्या रु. १७,५९,८१,०५९/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या तांत्रिक मान्यतेच्या अधीन राहून दिनांक ११/०९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. त्यानूसार, आयुक्त नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांनी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे सादर केलेल्या गोदावरी नदी संवर्धनाच्या रु. १७,२५,९२,८८३/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने त्यांच्या क्र. प्रपत्र नमुना क्र. ८५ बाब क्र. ५८ माहे सप्टेंबर २०१९, दिनांक १६/०९/२०१९ अन्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने तांत्रिक मान्यता दिलेली रक्कम रु. १७,२५,९२,८८३/- व १% कंटीजन्सी चार्जेस रु. १५,४१,००८/- अशा एकूण रु. १७,४१,३३,८९१/- इतक्या प्रकल्प किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या एकूण रकमेपैकी ८०% हिस्सा राज्य शासन व २०% हिस्सा नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांचा राहील. महानगरपालिकेच्या २०% हिश्याबाबत महानगरपालिकेने शासनाकडे सादर केलेल्या ठरावाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.

३. शासनाने वितरित केलेल्या निधीच्या विहित प्रमाणात आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांनी त्यांचा अनुज्ञेय हिस्सा स्वतंत्र खात्यात जमा करावा. सदर हिस्सा प्रकल्पावर खर्च केल्याशिवाय तसेच, प्रकल्पांतर्गत होणा-या कामांचे गुणवत्ता लेखापरिक्षण केल्याशिवाय पुढील हप्ता मुक्त करण्यात येणार नाही.

४. योजनेच्या प्रत्येक टप्प्यात हाती घेण्यात येणाऱ्या कामाचे मंजूर तांत्रिक आराखडे, अंदाजपत्रके, नकाशे, संकल्पचित्रे इ. शासनाकडे काम सुरु करण्यापूर्वी सादर करणे बंधनकारक असेल. शासनास उपरोक्त माहिती सादर केल्यानंतरच कामे सुरु करण्यात यावीत. हाती घेण्यात यावयाच्या ("प्रपत्र-अ" मधील नमूद कामे) कामासंबंधित नदीच्या सद्यस्थितीची छायाचित्रे घेण्यात यावी. तसेच व्हीडीओ रेकॉर्डिंग करण्यात यावे. कामांच्या प्रगतीनुसार दर दोन महिन्यांनी याप्रकारे छायाचित्रण करण्यात यावे.

५. राज्य नदी संवर्धन क्षेत्रात तज्ञ व कामाचा अनुभव असलेली तसेच "प्रपत्र-अ" नुसार मंजूर खर्चाच्या बाबी संबधीत तज्ञ व पुरेसे तांत्रिक मनुष्यबळ असलेली संस्था /शासकीय प्राधिकरण/मंडळ यांची प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्था म्हणून आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांनी विहित पध्दतीने नियुक्ती करावी. ही संस्था "प्रपत्र-अ" नुसार मंजूर खर्चाच्या बाबींचे स्थानिक डी. एस. आर. प्रमाणे खर्चाचे अंदाज, कामाचे आराखडे तयार करणे व तपासणे कामाची गुणवत्ता राखणे, सर्व कामे विहित कालमर्यादेत पूर्ण करणे याबाबत वेळोवेळी समन्वय करेल. महानगरपालिकेने प्रकल्पासाठी तांत्रिक मनुष्यबळ तयार होण्यासाठी या संस्थेचा उपयोग करावा.

६. ही कामे शासन आदेशाच्या दिनांकापासून/धनादेशाच्या दिनांकापासून ३६ महिन्यात किंवा तत्पूर्वी पूर्ण करण्यात यावीत. ह्या कालावधीनंतर कामे पूर्ण करण्यासाठी लागणारा खर्च हा संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेकडून करण्यात यावा.

७. कामे विहित कालावधीत पूर्ण करण्याची व कामाची गुणवत्ता राखण्याची संपूर्ण जबाबदारी ही आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांची असेल. सदर प्रकल्पाच्या कामासाठी लागणारा निधी खर्च करताना आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांच्या देखरेखेखाली करण्यात यावा.

८. प्रकल्पाची यथायोग्य अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीकोनातून प्रकल्प अंमलबजावणी समितीची आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांच्या अध्यक्षतेखाली स्थापना करण्यात यावी. या समितीत महानगरपालिकेतील संबंधित अधिकारी, कर्मचारी, पर्यावरण विषयक तज्ञ, उपरोक्त प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेचे प्रतिनिधी यांच्यासह महानगरपालिकेस आवश्यक वाटतील अशा प्रतिनिधींचा समावेश करण्यात यावा. ही समिती प्रकल्पांतर्गत होत असलेल्या सर्व कामकाजाचे सनियंत्रण करेल व कामांच्या गुणवत्तेवर नियंत्रण ठेवेल. सदर समितीची आढावा बैठक दर महिन्याला आयोजित करण्यात यावी.

९. नदीच्या निळ्या व लाल पूररेषेच्या दरम्यान काही कामे प्रस्तावित असल्यास सदर कामे करण्याकरिता सक्षम प्राधिकाऱ्याची पूर्व परवानगी घेणे बंधनकारक आहे.

१०.प्रकल्प पूर्ण झाल्यावरही प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेच्या मदतीशिवाय नदीचे संवर्धन होणे गरजेचे असल्याने योजनेची कामे पूर्ण झाल्यावरही ही समिती बैठका आयोजित करेल. ही समिती भौतिक बाबींची देखभाल, प्रकल्पांपासून मिळणारे उत्पन्न, प्रकल्प संवर्धनासाठी उपाययोजना व खर्च याबाबत आढावा घेत राहील.

११.काम पूर्ण झाल्यावर किमान पुढील १० वर्षापर्यंत नदीची देखभाल व दुरुस्ती महानगरपालिकेने स्वखर्चाने करावयाची आहे. तसेच महानगरपालिकेने प्रकल्प अंमलबजावणी समितीचा अहवाल प्रत्येक ६ महिन्यांनी शासनाकडे पाठविण्याची व्यवस्था करेल.

१२.नदीच्या पाण्याची गुणवत्ता चालू महिन्यापासून पुढे प्रत्येक महिन्याला तपासण्यात यावी. पाण्याची गुणवत्ता तपासण्यासाठी या क्षेत्रातील तज्ञ प्रयोगशाळेची /संस्थेची /मंडळाची नियुक्ती करण्यात यावी. दर महिन्याचा पाण्याच्या गुणवत्तेचा अहवाल सदर संस्था प्रकल्प सनियंत्रण समितीस व पर्यावरण विभागास दर तीन महिन्यांनी सादर करेल.

१३.उपरोक्त मुद्यानुसार केलेल्या कार्यवाही प्रमाणे आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड हे शासनास दर तीन महिन्याला खालील अहवाल सादर करतील.

अ. मंजूर कामांचा भौतिक प्रगती अहवाल

ब. पाण्याच्या गुणवत्ता अहवालाच्या प्रती

क. प्रकल्प सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

ड खर्चाचे प्रत्येक तिमाहीचे उपयोगिता प्रमाणपत्र

१४.सदर अहवाल सादर केल्याशिवाय कामाच्या पुढील टप्प्यातील निधी उपलब्ध करुन देण्यात येणार नाही. तसेच आर्थिक वर्षाचे उपयोगिता प्रमाणपत्र वर्ष संपल्यानंतर एप्रिलच्या १० तारखेपर्यंत पर्यावरण विभागास सादर करावे. उपरोक्त मंजूर योजनेसाठी निधी उपलब्धतेनुसार अनुदान मुक्त करण्यात येईल.

१५.योजनेंतर्गत मंजूर विशिष्ट कामासाठी अदा केलेली वा मान्य केलेली रक्कम त्याच कामासाठी राज्य शासनाने घालून दिलेल्या अटी व शर्ती प्रमाणे व विहित कालमर्यादेत मान्य केलेल्या खर्चाच्या मर्यादेत खर्च करणे आवश्यक आहे. हा निधी इतर दुस-या कोणत्याही कामासाठी वा महानगरपालिकेच्या कामासाठी वापरता येणार नाही किंवा वळता करता येणार नाही. विशिष्ट कामासाठी मान्य केलेल्या खर्चापेक्षा जास्त खर्च झाल्यास त्याची जबाबदारी आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांची राहील.

१६.या योजनेंतर्गत प्राप्त होणारा निधी हा राष्ट्रीयकृत बँकेत स्वतंत्र खाते उघडून त्या अंतर्गत जमा करावा व बँकेत ठेवलेल्या निधीवर मिळणारे व्याज याच निधीत जमा करावे. या निधीच्या उपयोगितेवर नियंत्रण राहण्यासाठी खात्याचे संचालन आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांच्याव्दारे करण्यात यावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतेवेळी बॅकेतील या खात्यावर झालेल्या व्यवहाराच्या नोंदी दर्शविणा-या पासबुकाची साक्षंकित प्रत सोबत जोडण्यात यावी.

१७.योजना पूर्ण झाल्यावर या योजनेंतर्गत निर्माण झालेल्या मालमत्तेपासून किंवा सोयीसुविधांपासून मिळणारे उत्पन्न हे या योजनेसाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यातच जमा करण्यात यावे. या उत्पन्नातून नदी संवर्धनासाठी अतिरिक्त कामे राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाच्या अनुमतीने हाती घेता येतील. मात्र नदी संवर्धनाच्या कामाव्यतिरिक्त इतर कोणत्याही कामासाठी हा महसूली निधी वापरता येणार नाही.

१८. मंजूर बाबीतील खर्चामध्ये बचत झाल्यास बचत झालेला निधी योजनेतीलच दुस-या उपांगासाठी राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाच्या परवानगीने वापरता येईल.

१९.राज्य नदी संवर्धन योजनेंतर्गत निर्माण केलेल्या यंत्रणेच्या देखभाल व दुरुस्तीचा खर्च योजना कार्यान्वित झाल्यानंतर संबंधीत महानगरपालिकेच्या स्वत:च्या निधीतून भागावावयाचा आहे.

२०.योजनेंतर्गत खर्च करण्यात येणा-या रकमेचे लेखे प्रचलित लेखा संहितेनुसारच ठेवण्यात यावेत व त्याचे लेखापरिक्षण स्थानिक निधी व लेखापाल यांच्याव्दारे करण्यात यावे व त्याचा अहवाल पर्यावरण विभागास पाठविण्यात यावा. तसेच प्रत्येक आर्थिक वर्षा अखेर झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधीत महालेखापाल कार्यालयास पाठविण्याची जबाबदारी आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड राहील.

२१.नदीच्या कामांच्या प्रगतीच्या अहवालाची तसेच खर्चाच्या विवरणपत्राची पर्यावरण विभागाच्या सक्षम अधिका-यांकडून तपासणी करण्यात येईल व तपासणीच्या वेळी महानगरपालिकेने आवश्यक ती सर्व कागदपत्रे उपलब्ध करुन देणे बंधनकारक असेल.

२२.योजनेवरील कामासाठी मान्यता प्राप्त झालेल्या रक्कमेपेक्षा अधिक खर्च झालेली रक्कम शासनाकडून उपलब्ध होणार नाही. या कामासाठी शासनाने अदा केलेली रक्कम जर त्या कामावर घालून दिलेल्या

विविक्षित वेळेमध्ये खर्च होऊ शकत नसेल तर त्यास राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक असेल.

२३. योजनेवरील कामासाठी अदा केलेली रक्कम योग्यरितीने वापरली जात नाही किंवा कामाची योग्य ती प्रगती होत नाही असे शासनाच्या निदर्शनास आल्यास शासन कोणत्याही क्षणी अशा कामांची प्रशासकीय मान्यता रद्दबातल करु शकेल.

२४. योजनेवरील कामांसाठी राज्य शासनाच्या अनुदाना व्यतिरिक्त शासनाकडून, वित्तीय संस्थांकडून वा आणखी कोणत्याही संस्थांकडून प्राप्त निधी या योजने अंतर्गत खर्च झाल्याचे दर्शविण्यात येऊ नये. (No Overlapping of schemes)

२५. योजनेचे समन्वयन व पर्यवेक्षण करण्यासाठी भेट देणा-या राज्य शासनाच्या अधिका-यांस आवश्यक त्या सर्व प्रशासकीय सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक असेल.

२६. योजनेंतर्गत शासनाच्या अनुदानातून तयार केलेली मालमत्ता, ज्या कामासाठी निर्माण केली आहे, त्याच कामासाठी वापरणे आवश्यक आहे व त्यासाठी ही मालमत्ता अभिलेखित करणे आवश्यक आहे.

२७. योजनेंतर्गत करण्यात येणा-या निरनिराळया कामांचे व समन्वयाचे काम राज्यस्तरावरील सनियंत्रण समितीव्दारे करण्यात येते. या समितीने कामाबाबत वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक असेल.

२८. योजनेंतर्गत महानगरपालिकेच्या होणा-या आस्थापनेवरील व लागणा-या मनुष्यबळावरील खर्च संबंधीत स्थानिक स्वराज्य संस्थेव्दारे करण्यात येईल. त्यासाठी या विभागाकडून अनुदान देण्यात येणार नाही.

२९. योजनेंतर्गत करण्यात येणाऱ्या कामांचे अभिलेख व छायाचित्रांसह पुरावे महानगरपालिकेने जतन करावेत. तसेच सदरबाबत अभिलेखामध्ये नोंद करुन ठेवावी.

३०. नदी संवर्धनाबाबत मंजूर कामांमध्ये नदीतील गाळ काढणे व सिल्ट ट्रॅप लावण्याच्या कामाचा समावेश असल्यास, नदीच्या गाळ काढण्याच्या कामाबरोबरच तसेच पावसाळयापूर्वी सिल्ट ट्रॅप लावण्याचे काम पूर्ण होणे आवश्यक आहे. अन्यथा नदीत पुन्हा गाळ जमा होऊ शकतो.

३१. नदीच्या कामास सुरवात करण्यापूर्वीची छायाचित्रे विभागास सादर करावीत.

३२. राज्य शासनाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटींचे व शर्तींचे पालन करणे महानगरपालिकेस बंधनकारक राहील.

३३. योजनेंतर्गत किती लोकांना रोजगार उपलब्ध झाला याची नोंद ठेवावी.

३४. योजना कालमर्यादेत पूर्ण करणे बंधनकारक असल्याने योजने करिता कोणतेही एस्कलेशन चार्जेस अनुज्ञेय नाहीत.

३५.योजनेंतर्गत मंजूर कामांच्या निविदा हया शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विहित प्रक्रियेचा अवलंब करुन स्विकाराव्यात. तसेच प्रकल्पांतर्गत मंजूर किंमतीपेक्षा जास्त किंमतीच्या निविदा स्विकारण्यात येऊ नयेत.

३६.ठेकेदाराने विहित वेळेत काम पूर्ण न केल्यास त्यांच्यावर दंड आकारण्याची तरतूद ठेवण्यात यावी.

३७.योजनांतर्गत झालेल्या सर्व खर्चाचा ताळमेळ वेळोवेळी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई व तसेच महालेखाकार कार्यालय, मुंबई/ नागपूर यांच्या कार्यालयाशी घालण्याची जबाबदारी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेची असेल.

३८. योजना पूर्ण झाल्यावर भविष्यात नदीच्या उपयोगाबाबत व वापराबाबत किंवा नदीसंदर्भात कोणतीही नवीन कामे हाती घ्यावयाची झाल्यास त्यास प्रथम राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाची मान्यता घेण्यात यावी.

३९.नदीच्या क्षेत्राबाबत, मालकीबाबत, राबविण्यात येणा-या कामाच्या गुणवत्तेबाबत तसेच Surface floting wetland beds बाबत वा इतर संबंधित बाबींबाबत भविष्यात काही न्यायालयीन वा अन्य बाबी उदभवल्यास संबंधित अधिकारी तसेच आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड सर्वस्वी जबाबदार राहील.

४०.उपरोक्त अटींव्यतिरिक्त राष्ट्रीय नदी संवर्धन संचलनालयाने नदी संवर्धन योजनेतंर्गत प्रस्तावाच्या अनुषंगाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील नियम व अटींचे पालन करणे बंधनकारक राहील.

४१.राज्य नदी संवर्धन योजनेतंर्गत सचिव स्तरावरील प्रदत्त समितीच्या दिनांक ०९/०८/२०१९ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तातील अटींचे व शर्तीचे पालन करणे बंधनकारक राहील.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: CN = SURYAKANT KISAN NIKAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT
Date: 2022.03.31 17:41:10 +05'30'

**( सु.कि. निकम )**

**सह सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल)**